**सन २०१४-१५ मध्ये राज्यातील कोरडवाहू शेतीच्या स्थैर्यासाठी तरतूद करणे सदर योजनेअंतर्गत रु.२२.५० कोटी रकमेचा कार्यक्रम राबविण्यास वित्तिय मान्यता देणेबाबत...**

## महाराष्ट्र शासन

### कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

### शासन निर्णय क्रमांकः कोशेअ-पूरक २०१४/प्र.क्र८३/१४/२अे

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, ४०० ०३२
तारीख: १२ फेब्रुवारी,२०१५

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांकः कोशेअ-२०११/प्र.क्र.४३/११/(भाग-४)/२अे,दि.१२.०३.२०१४
२) शासन निर्णय क्रमांकः कोशेअ-२०१४/प्र.क्र.८२/१४ २अे,दि.१६.०५.२०१४
३) शासन निर्णय क्रमांकः कोशेअ-पूरक २०१४/प्र.क्र.८३/१४ /२अे दि.३०.०७.२०१४
४) शासन निर्णय क्रमांकः कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआआ-२०१४/कोशेअमा/ प्र.क्र. ९८ / कॅंप /९ कोशेअ(रासक),दि.१७.१२.२०१४
५) शासन निर्णय क्रमांकः शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अंदाज२०१३/प्र.क्र.८५/ अर्थसंकल्प-३ दि.०९.०२.२०१५

**प्रस्तावना :**

राज्य शासनाने उपरोक्त संदर्भ क्र.१ वरील शासन निर्णयान्वये कोरडवाहू शेती अभियान अंतर्गत विविध योजनांचा समन्वय करून (Convergence) सन २०१४-१५ ते २०१८-१९ या कालावधीत रु.२०००० कोटीचा कार्यक्रम राबविण्यास तसेच त्यापैकी रु.२००० कोटी तरतूद कोरडवाहू शेती अभियान योजनेस स्वतंत्ररित्या उपलब्ध करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने कोरडवाहू शेती अभियान (Dryland Farming Mission ) कार्यक्रम सन २०१४-१५ मध्ये राबविण्यास संदर्भ क्र.२ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

सन २०१४-१५ करिता राज्यातील कोरडवाहू शेतीच्या स्थैर्यासाठी तरतूद करणे ही योजना राबविण्यास एकूण रु.१५०००.०० लाख इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आलेली आहे. सदर अर्थसंकल्पिय तरतूदीपैकी संदर्भ क्रमांक २ व ३ अन्वये एकूण रु.९०००.०० लाख रकमेच्या कार्यक्रमास वित्तिय मान्यता देण्यात आलेली आहे

वित्त विभागाने संदर्भ क्र.५ अन्वये सन २०१४-१५ मधील योजनांतर्गत योजनांच्या अर्थसंकल्पित तरतूदीच्या ७५% मर्यादेपर्यंत निधी वितरित करण्यास सहमती दिलेली आहे. यानुषंगाने राज्यातील कोरडवाहू शेतीच्या स्थैर्यासाठी तरतूद करणे या योजनेअंतर्गत अर्थसंकल्पिय तरतूदीच्या ७५% मर्यादेत उर्वरित रक्कम रु.२२५०.०० लाख रकमेच्या कार्यक्रमास वित्तिय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

कोरडवाहू शेती अभियान अंतर्गत मनुष्यबळ विकास,संरक्षित सिंचन सुविधा,यांत्रिकीकरण, कोरडवाहू पिंकांच्या वाणांची प्रात्यक्षिके,संरक्षित शेती,प्राथमिक कृषि प्रक्रिया व पणन इत्यादी घटकांचा वापर करुन सन २०१४-१५ ते सन २०१८-१९ या कालावधित रु.२०००० कोटीचा कार्यक्रम राबविण्यास तसेच त्यापैकी रु.२००० कोटी तरतूद कोरडवाहू शेती अभियान योजनेस स्वतंत्ररित्या उपलब्ध करुन देण्यास संदर्भ क्रमांक १ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

सन २०१४-१५ मध्ये राज्यातील कोरडवाहू शेतीच्या स्थैर्यासाठी तरतूद करणे ह्या योजनेअंतर्गत अर्थसंकल्पिय तरतूदीच्या ७५% मर्यादेत उर्वरित रक्कम रु.२२५०.०० लाख रकमेच्या कार्यक्रमास वित्तिय मान्यता देण्यात येत आहे.

या प्रित्यर्थ होणारा खर्च सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी मागणी क्र.डी-३ २४०१-पिकसंवर्धन ,१०९ विस्तार व प्रशिक्षण,(०१) (५०) राज्यातील कोरडवाहू शेतीच्या स्थैर्यासाठी तरतूद करणे (२४०१ ९२५१) योजनांतर्गत (दत्तमत) ३३-अर्थसहाय्य या लेखाशिर्षांतर्गत मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येवून खर्ची टाकण्यात यावा.

संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे यांना सदर अभियानासाठी वरील निधी खर्च करण्यास आहरण व संवितरण अधिकारी व राज्य नोडल अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच मंजूर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यासही त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

अभियान राबविण्याकरिता येणारा प्रशासकीय व संकिर्ण खर्च एकूण कार्यक्रमाच्या २% निधीतून भागविण्यात यावा.

सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचे संदर्भ क्र.५ दि.०९.०२.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार व मा.अपर मुख्य सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०१५०२१२१२४४१४५९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madan Umesh M

Digitally signed by Madan Umesh M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Madan Umesh M
Date: 2015.02.12 12:54:19 +05'30'

( उ.म.मदन )
**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि व फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२.
२. मा.मंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.

३. मा.मंत्री (सहकार ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
४. मा.मंत्री (ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
५. मा.मंत्री (जलसंपदा ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
६. कुलगुरु,मराठवाडा कृषि विद्यापिठ,परभणी
७. कुलगुरु, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापिठ,अकोला
८. कुलगुरु,महात्मा फुले कृषि विद्यापिठ,राहूरी,जि.अहमदनगर
९. कुलगुरु ,डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापिठ,दापोली, जि.रत्नागिरी
१०.अपर मुख्य सचिव (कृषि व पणन) कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
११.सचिव (पदुम) कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
१२.सचिव (मृद व जलसंधारण) ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१३.सचिव (ग्रामविकास) ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१४.सर्व विभागीय आयुक्त
१५.कृषि आयुक्त,महाराष्ट्र राज्य,पुणे (५ जादा प्रतीसह)
१६.आयुक्त,सहकार,महाराष्ट्र राज्य,पुणे
१७.आयुक्त,पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य,पुणे
१८.आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य,पुणे
१९.आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य,पुणे
२०.साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य,पुणे
२१.महालेखापाल महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) मुंबई
२२.महालेखापाल महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) नागपुर
२३.सर्व जिल्हाधिकारी
२४.संचालक (विस्तार व प्रशिक्षण ) कृषि आयुक्तालय,पुणे (५ जादा प्रती)
२५.संचालक (पणन ) सहकार विभाग,महाराष्ट्र राज्य,पुणे
२६.संचालक (समाज कल्याण) महाराष्ट्र राज्य,पुणे
२७.संचालक, रेशीम उद्योग,पुणे-मुंबई रस्ता,शासकिय दुध डेअरी समोर,पुणे-०३
२८.संचालक,सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य,पुणे
२९.संचालक,वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपुर
३०.सर्व संचालक/कृषि सहसंचालक,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
३१.संचालक( लेखा व कोषागारे) मुंबई,
३२.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
३३ .प्राचार्य,विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,खोपोली,ता-खानापूर जि.रायगड

३४.प्राचार्य,विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,गेट क्रमांक ४ शहाजीनगर, लाईन बाजार, कोल्हापूर.

३५.प्राचार्य,विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, बुलडोजर युनिट शिवाजीनगर, पोस्ट ऑफिस जवळ,च-होली,पुणे

३६.प्राचार्य,विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, संभाजी चौक,उंटवाडी रोड,नाशिक

३७.प्राचार्य,विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,शहानूर मिया,दर्गा रोड,औरंगाबाद

३८. प्राचार्य,विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, तपोवन रोड,अमरावती

३९.प्राचार्य,विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, बंगला क्रमांक ६२/१, धरमपेठ,नागपुर

४०.सर्व जिल्ह्यांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद

४१.सर्व जिल्ह्यांचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी

४२.अधिदान व लेखाधिकारी,मुंबई

४३.निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई

४४.सर्व विधान सभा सदस्य व विधान परिषद सदस्य,

४५.ग्रंथपाल,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,ग्रंथालय विधानभवन,मुंबई (२प्रती)

४६.महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई

४७.उपसचिव (नियोजन विभाग),मंत्रालय,मुंबई

४८.उपसचिव (व्यय-१)/अर्थसंकल्प-१३वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई

४९.सर्व सहसचिव/उप सचिव/अवर सचिव,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई

५०.सहाय्यक संचालक (लेखा-२) कृषि आयुक्तालय,पुणे

५१.लेखाधिकारी (अर्थसंकल्प) कृषि आयुक्तालय,(महाराष्ट्र राज्य)पुणे

५२.निवड नस्ती (कार्यासन २अे)